आपत्ती सौम्यीकरणासाठी प्रस्तावांचे मुल्यमापन करण्यासाठी राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणांतर्गत समितीची स्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२१/प्र.क्र.१५५/आव्यप्र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. ०२ मार्च, २०२३

वाचा:- १) आपत्ती व्यवस्थापन विभाग, केंद्रीय गृह मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. ३०-०२-२०२० NDMA-१, दि. १४ जानेवारी, २०२२ रोजीच्या मार्गदर्शक सूचना.

२) शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२१/प्र.क्र.१५५/आव्यप्र-१, दि. २० मे, २०२२.

**प्रस्तावना:-**

आपत्ती सौम्यीकरणासाठी राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधी आणि राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून २० % निधी १५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनूसार प्राप्त होणार आहे. त्या संदर्भातील मार्गदर्शक सूचना गृह मंत्रालय, भारत सरकार यांनी संदर्भाधिन क्र. १ अन्वये निर्गमित केल्या आहे.

मार्गदर्शक सूचनांनूसार आपत्ती सौम्यीकरणासाठी यासाठी प्राप्त होणारा निधी आपत्ती प्रवणता लक्षात घेवून राबवायच्या प्रकल्पांसाठी सौम्यीकरण उपाययोजना, आपत्तीपूर्व सूचना प्रणालीचे सक्षमीकरण करणे, पूर्वतयारी आणि प्रतिसाद यंत्रणांचे सक्षमीकरण करणे, प्रशिक्षण, जनजागृती त्याचप्रमाणे आपत्ती प्रतिसाद दलाचे आणि यंत्रणेचे सक्षमीकरण करण्यासाठी उपलब्ध करण्यात आला आहे.

राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास प्राप्त होणाऱ्या उपरोक्त निधीच्या विनियोगासाठी राज्यस्तरावर राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणांतर्गत संदर्भाधिन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये आपत्ती सौम्यीकरणासाठी प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांचे मुल्यमापन करण्यासाठी समिती गठीत करण्यात आली होती. सदर समिती पूनर्गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

१५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनूसार केंद्र शासनाकडून राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधी आणि राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून प्राप्त होणाऱ्या २०% निधी अंतर्गत आपत्ती सौम्यीकरणासाठी प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांचे मुल्यमापन करणे आणि प्रस्तावाच्या अनुषंगाने राज्य कार्यकारी समितीस शिफारस करणे यासाठी महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणांतर्गत खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | प्रा. रवि सिन्हा (आयआयटी, मुंबई) | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (जलसंपदा) | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम) | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन) | सदस्य |
| ६ | संचालक (आपत्ती व्यवस्थापन प्रभाग) | सदस्य सचिव |

वरील समितीने राज्य आपत्ती सौम्यीकरण निधी अंतर्गत प्राप्त होणाऱ्या तरतूदीतून घ्यावयाच्या सौम्यीकरणाच्या कामाच्या प्रस्तावांचे मुल्यमापन करुन राज्य कार्यकारी समितीस शिफारस करतील.

अन्य मंत्रालयीन विभागाशी संबंधित प्रस्ताव असल्यास संबंधित विभागांच्या अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव यांना समितीच्या बैठकीस विशेष निमंत्रित म्हणून आमंत्रित करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०३०२१५१८०६०५१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

(हितेंद्र दुफारे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई (सर्व)
४) विभागीय आयुक्त (सर्व)
५) जिल्हाधिकारी (सर्व)
६) निवड नस्ती/ आव्यप्र-१